**राज्य राखीव पोलीस बल, प्रशिक्षण केंद्र, नानवीज**
**यास स्वतंत्र कार्यालयाचा दर्जा देण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय, क्रमांक : एसआरपी-०३०४/प्र.क्र.१५०/पोल-५ अ
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक : ४.८.२०१०.

**वाचा:-** १) पोलीस महासंचालक कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/२६-ब/पदनिर्मिती/नानवीज प्र.केन्द्र/६१/०७, दिनांक १५.२.२०१०

२) अप्पर पोलीस महासंचालक, रा.रा.पोलीस बल, मुंबई यांचे पत्र क्र.अपोमसं/ रारापोबल/०३/१८२ (बी)/२००९/१०६०, दि. २ एप्रिल, २०१०.

**शासन निर्णय** :

राज्य राखीव पोलीस बल, गट क्रमांक १ पुणे येथे असलेले नवप्रविष्ठ शिपाई प्रशिक्षण केन्द्र दि.१.१.१९८८ पासून नानवीज, ता.दौंड, जि.पुणे येथे राज्य राखीव पोलीस बल गट क्रमांक ५ यांच्या अखत्यारित चालू झाले आहे. राज्यातील इतर पोलीस प्रशिक्षण विद्यालये अप्पर पोलीस महासंचालक प्रशिक्षण व खास पथके यांच्या अधिपत्याखाली असून त्यांना स्वतंत्र दर्जा आहे. त्याच धर्तीवर राज्य राखीव पोलीस प्रशिक्षण केन्द्रात निमलष्करी दलातील जवानांना प्रशिक्षण दिले जात असल्याने नानवीज प्रशिक्षण केन्द्रास विशेष पोलीस महानिरिक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखाली स्वतंत्र दर्जा देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक विअप्र-१००८/प्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-१ ते ५ मध्ये करण्यात आलेल्या सुधारणातील भाग-पहिला, उप विभाग-एक, अनुक्रमांक-३, नियम दोन नुसार "कार्यालय प्रमुख" म्हणून घोषित करण्याच्या प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारांमध्ये राज्य राखीव पोलीस बल प्रशिक्षण केन्द्र नानवीज, ता. दौंड, जि.पुणे या कार्यालयास स्वतंत्र दर्जा देण्यात येत आहे. तसेच तेथील प्राचार्य

यांना "कार्यालय प्रमुख व नियंत्रण अधिकारी" व उप प्राचार्य यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हे आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र २२७/१०/व्यय-७, दिनांक १४.७.२०१० अन्वये मान्यता घेऊन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( सदानंद जाधव )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, पुणे, नाशिक, नागपूर, औरंगाबाद, सोलापूर, अमरावती, नवी मुंबई, ठाणे,
अप्पर पोलीस महासंचालक, प्रशिक्षण व खास पथके, मुंबई,
विशेष पोलीस महानिरिक्षक, मोटार परिवहन, पुणे,
सर्व पोलीस अधीक्षक, जिल्हा पोलीस अधीक्षक, महाराष्ट्र राज्य,
प्राचार्य, राज्य राखीव पोलीस बल, प्रशिक्षण केन्द्र, दौंड,
प्रधान महालेखाकार (लेखा परीक्षा-१), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा व अनुज्ञेयता)(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
वित्त विभाग (व्यय-७/विनियम) अर्थोपाय शाखा, मंत्रालय, मुंबई,
गृह विभागातील सर्व कार्यासने,
गृह विभागाच्या अधिनस्त असलेले सर्व विभाग प्रमुख कार्यासन प्रमुख
निवड नस्ती, पोल-३.